नवनाथ भक्तिसार   अध्याय दुसरा

श्री गणेशाला वंदन करून मूळपीठ निवासिनी रेणुकामातेचा जयजयकार करीत ग्रंथकर्ता विनवणी करीत आहे की मंगलमयी गोंधळासाठी (ग्रंथनिर्मितीच्या कार्यसाठी) तू उपस्थित आहे; आणि तुझ्या उपस्थितीचा प्रभाव वातावरणावर असल्यामुळे प्रतिभा कार्यान्वित झाली आहे. तस्मात सर्व देव देवतांची अशीच कृपादृष्टी असावी. ज्यायोगे आम्ही अंगिकारलेल्या या शुभ कार्याला निश्चितच चालना मिळणार आहे.

मागील अध्यायात भगवंताच्या इच्छेने आणि आग्रहाने नवनारायण पृथ्वीतलावर मानव योनीत जन्म घेऊन कलीयुगातही भक्तिमार्गाची अवहेलना होऊ नये यासाठी सज्ज झाले आहेत. त्या अनुषंगाने आद्य 'कवी' नारायणांनी विधीलेखितान्वये मत्यसीच्या उदरी जन्मून आपले अस्तिव प्रकट केले आहे. कामिक व शारद्वता या कोळी दांपत्याला अल्पकाल संतुष्ट करून पांच वर्षांचा हा बालक मजल दरमजल करीत, अर्थात मच्छिंद्र नामानिधान स्वीकारलेले साक्षात कवीनारायण उत्तर दिशेला बद्रीकावनात आले आहेत. तहत बारा वर्षे कालावधीची उग्र तपश्चर्या पूर्ण झाल्यावर श्री शिव आणि श्री दत्तात्रेय हे सुध्दा तिथे आले आहेत. हा केवळ योगायोग नव्हता तर हे सारे विधिलीखीताप्रमाणे घडत होते.

पक्षी वृक्षा वृक्षांवर जसे फळांच्या शोधात विहरत असतात, तद्वत श्री दत्तात्रेय आणि उमापती श्री शंकर भगीरथी नदीच्या तीरावरील निसर्गशोभा न्याहाळीत त्या निबिड अरण्यात मार्गक्रमण करीत असताना अचानक उभयतांची दृष्ठी तपश्चर्यावस्थेत असलेल्या या युवकावर पडली, आणि ते स्तब्ध झाले. त्या किशोरावस्थेतल्या युवकाची दशादशा झाली होती. अस्थिपंजर झालेला कृश देह, हाडाच्या सापळयावरील त्वचा निस्तेज आणि शुष्क झालेली. हात आणि पायांच्या नखांची वेडीवाकडी वाढ झाल्याने अवयवांना कुरूपता आली होती. अस्ताव्यस्त वाढलेल्या डोईवरील केशसंभाराच्या जटांमुळे मच्छिंद्राच्या व्यक्तीमत्वात विलक्षण भेसुरपणा निर्माण झाला होता, विशेष म्हणजे लोखंडी खिळयांच्या तीक्ष्ण अग्रावर पायाचा अंगठा ठेऊन उभ्या उभ्याने तपाचरण कृती मात्र अविरतपणे सुरु होती. डोळयांची मंदगतीने होत असलेली उघडझाप आणि क्षीण कष्टप्रद उच्चारात होत असणारे नामस्मरण हीच जिवंत पणाची साक्ष जाणवत होती.

असा हा उग्र तपस्वी पाहुन श्री दत्त आणि श्री शंकर अचंबित झाले. दत्तगुरू म्हणाले, "आदिनाथ! हा युवक विश्वामित्र ऋषींप्रमाणे तपस्व्यांचा मुकुटमणी म्हणून शोभत आहे. कोणत्या साध्यासाठी हा एवढे तप करीत आहे? त्यावर श्री शंकर उत्तरले, "मी इथे आराम करीत बसतो, आपण त्या तपस्व्याच्या समीप जाऊन विचारावे की कोणत्या मनोकामनेच्या पूर्ततेसाठी तो हा घोर तपाचरण करीत आहे?" श्री दत्तगुरूंनी तेथे जाऊन, "अहो!! तपस्वी महाराज! अशी प्रेमळ हाक मारीत पृच्छा केली. मच्छिंद्रानी आपल्या अर्धोन्मिलीत नेत्रांनी पहिले असता. त्यांना दत्तगुरू दृष्टीस पडले. केवळ नेत्रपल्लवीने मच्छिंद्रानी दत्तगुरूंना वंदन केले, आणि नम्रपणाची देहबोली स्पष्ट करीत ते म्हणले, "महराज! मी ईश्वर प्राप्तीस्तव तप करीत आहे. आपण कोण आहात ते कृपया सांगावे, कारण बारा वर्षे झाली, परंतु आजतागायत येथे मानव दृष्टीस पडला नाही, अंबा भवानी मातेची कृपा म्हणून आपले दर्शन झाले असावे."

श्री. दत्तगुरू उत्तरले, “मी अत्रिसुत दत्त आहे पण एवढा घोर तप तू कशासाठी करीत आहेस” त्यावर मच्छिंद्र म्हणाले, “गुरुदेव! माझे तप सिद्ध झाले आहे, तुम्ही मला धन्य केले आहे.” आणि त्यांच्या चरणावर आपला देह झोकून दिला. गोमातेपासून चुकामूक झालेल्या वासराला पुनश्च गोमाता दिसल्यावर ते जसे आनंदित होते किंवा आई अचानक सामोरी आल्यावर सासुरवाशीण कन्या ज्या जिव्हाळ्याने आईच्या गळयाला बिलगते त्याप्रमाणे बारा वर्षांच्या कष्टदायी तपश्चर्येची आज फलश्रुती झाल्याच्या आनंदाने गहिवरलेला मच्छिंद्र भावनावश होऊन दत्तगुरूंच्या पायाशी मिठी मारता झाला. नेत्रांच्या अश्रूधारांनी गुरुमहाराजांचे चरण ओलेचिंब झाले. कंठ दाटलेल्या अवस्थेत हुंदके देत तो म्हणाला, “गुरुमाउली! आपण ब्रह्मा, विष्णू, महेश अशा तीनही देवांचे अवतार आहात, आपण सर्वव्यापी, सर्वसाक्षी, सर्वज्ञमुर्ती असताना माझा विसर कसा पडला? हे दयाळा !! माझ्या हातून काही अपराध घडला आहे का? असे म्हणत त्याने हंबरडा फोडला, नमस्कार करू लागला, घोर तपाच्या श्रमाने क्षीण झालेल्या देहाला ग्लानी येऊ लागली, तरीही त्या ग्लानीच्या अवस्थेत पुन्हा पुन्हा त्याची चरणस्पर्शाची कृती थांबत नव्हती. दयावंत प्रभूंनी त्याला उठविले आणि दृढ आलींगन दिले, मायेच्या मामतेने त्याचे अश्रू थोपविले आणि म्हणाले, “बाळा चिंता करू नकोस! मी सांगेन त्या बीजमंत्राचा जप कर”

श्री दत्त माऊलींनी त्याच्या मस्तकावर आपला वरदहस्त ठेवून कानात मंत्र सांगताच मच्छिंद्रास विलक्षण चैतन्य जाणवू लागले, साक्षात ईश्वरी स्पर्शाने त्याचा कृश आणि विकल झालेला देह सुवर्ण कान्तीसम तेजस्वी आणि सुदृढ तर झालाच पण बेसूर झालेली चर्या विलक्षण तेजस्वी झाली. अज्ञानाची काजळी पुसली जाऊन प्रेरणा देणारी उर्जा त्याच्या देहाच्या अंतरंगात प्रकाशमान झाली. स्वतःमध्ये तसेच बाह्यरुपी जगात, सर्व चराचरात एकच ब्रह्म चैतन्य असल्याचा साक्षात्कार मच्छिंद्रास झाला. मायाभेद, बुद्धीभेद नष्ट होऊन अत्युच्च परमानंदाची अनुभूती त्यास झाली. ह्या अशा आनंदी मनस्थितीतल्या मच्छिंद्रास दत्तगुरुंनी विचारले, “वत्सा! सांग बरे ईश्वर कुठे आहे?”

मच्छिंद्रनाथ उत्तरले, “गुरुमाउली मला ईश्वराशिवाय अन्य काहीच दिसत नाही, सर्व चराचरात, जळी स्थळी, काष्ठी पाताळी एकच चैतन्यमयी ईश्वर भरून राहिला आहे.” उत्तराने समाधानी झालेल्या श्री. दत्तांनी त्याचा हाथ धरला आणि त्यास श्री शंकराजवळ आणले, आणि भोळ्या सांभ सदशिवाच्या पायावर घातले. मत्स्यीच्या पोटात असताना ज्ञान श्रावण करणारा, हा पूर्वीचा ‘कवी’ नारायण असल्याचे शिवाने ओळखले. त्यांच्या ही मनात प्रेम दाटून आले आणि त्यांनी मच्छिंद्रास हृदयाशी कवटाळले.

श्री शंकर दत्तात्रेयांस म्हणाले, “हे दत्तात्रेया! याला शिष्य करून सर्व ज्ञान, सिद्धी, सामर्थ्य दे. चार वेद सर्व सिद्धी, जारण मारण, उच्चाटन, शापनिवारण, शस्त्रास्त्र विद्या, मंत्र तंत्र यंत्र विद्या शिकूवन याला सज्ञान कर”. भोलेनाथच्या इच्छेप्रमाणे दत्तगुरूंनी मच्छिंद्रला देव देवतांचा आशीर्वाद प्राप्त करून दिलाच, शिवाय त्यांस नागास्त्र, वातास्त्र, पर्वतास्त्र, वज्रास्त्र, अग्निस्त्र, पर्जन्यास्त्र वगैरे अश्वविद्यांत पारंगत केले. कानाफाडी नाथ संप्रदायाचे भविष्यातील कार्य लक्षात घून संप्रदायाची शैली शिंगी वगैरे भूषण लेवविली. त्याच बरोबर नाथपंथांची दीक्षा दिली. सहा महिन्यानंतर मच्छिंद्र त्यांची आज्ञा घेऊन बद्रीकावन सोडून निर्थाटनासाठी निघाला.

परमेश्वरी कृपा प्रसादाने प्रसन्नचित्त अवस्थेत भ्रमंती करीत मच्छिंद्रनाथ दक्षिणेस सप्तश्रृंगी येथे आला. त्याच्या मनात विचार आला की परमेश्वरी कार्यासाठी आपण अवतारलो, पण परमेश्वरी कार्य म्हणजे काय? या भूलोकी

मानव जातीसाठी उपयुक्त होईल त्यांचे दुःख ताप हरण करील. अशी शाबरी विद्येची काव्यरचना करावी. पण त्यासाठी देवदेवतांचे आशीर्वाद आवश्यक असल्याने ते प्राप्त करणे गरजेचे आहे. त्यासाठी अंबा भावानीच काही मार्गदर्शन करील अशा विचाराने त्याने सात दिवसांचे अनुष्ठान आरंभले. सप्ताहाचे व्रत पूर्ण झाल्यावर साक्षात महिषासुरमर्दीनी आदिमाया प्रसन्न होऊन त्या स्थानी प्रकटली आणि म्हणाली, “बोल सुपुत्रा! तुझी काय मनोकामना आहे, काय आशीर्वाद देऊ तूला?

मच्छिंद्रनाथ म्हणले, “हे मते अंबिके! तु तर जगत् जननी आहेस पृथ्वीतलावरील संकट ग्रस्तांसाठी, त्यांची आपत्ती हरणासाठी त्यांनाच उपयोगी पडेल अशी दिव्या प्रार्थना मला काव्य रुपात राचवयाची आहे. त्यासाठी देवतांचा आशीर्वाद कसा मिळवू हे मला कुपा करून सांग.” मच्छिंद्राची परोपकाराची तळमळ पाहून अंबिकामाता प्रसन्न होऊन म्हणली, “तुझी मोनोकामना पूर्ण होईल. चल माझ्याबरोबर.” असे म्हणून देवीने त्याला मार्तंड पर्वतावर नेले. तेथे बीजमंत्राचे हवन करून सुवर्णासारखा दैदिप्यमान असा ‘नाग अश्वत्थ’ नामक वृक्ष जो अदृष्यावस्थेत होता तो दृष्यमान केला. हा वृक्ष म्हणजे सकल सिद्धींचे उत्पत्तीस्थान होते. कारण त्या वृक्षाच्या शाखा शाखांत असंख्य देवता मूळ स्वरूपात विराजमान झाल्या होत्या. अंबा माता वर्णन करू लागली.

हे मच्छिंद्रा ! तिथे पहा बावन्न वीर; नृसिहं, कालिका, महिषासूर, म्हंमदा आणि झोटींग, वीरभद्र, वेताळ, मारुती, राम बारा नावांची बारा सुर्यरूपे, बुध्यांशी जलदेवता असून त्यांची नावे; कुमारी, धनदा, नंदा, विमला, मंगला, लक्ष्मी, विख्याता तसेच आणखी झाडांवर पहा चंडा, चामुंडा, रंडा, कुंडा, महालंडा, जोगीनी, शंड, वितंडा या अप्सरा आहेत, “ते पहा तिकडे कालभैरव, वीरभैरव, भस्मकेत, सिद्धभैरव, रुद्रगणभैरव, अष्टभैरव असे आहेत”.

अंबिका माता पुढे सांगू लागली, “याशिवाय शस्त्रास्त्रे पुरविणाऱ्या दमी, धूमी, भामिनी, ज्वाला, शंखिनी, डंखिनी, यक्षिणी, इत्यादी बाराजणी आहेत. त्या तिथे प्राप्ती, प्राकाम्या, अणिमा, गरिमा, ईशित्व, प्रथिमा, महिमा या अष्टसिद्धीही आहेत तात्पर्य सर्व देवदेवता या महावृक्षावर विराजमान असून सर्वजण मूक आहेत. त्यांना प्रसन्न करून बोलते करणे आवश्यक आहे. त्यासाठी मी सांगते त्याप्रमाणे कृती कर, ब्रह्मगिरी जवळ अंजन पर्वत असून त्यावरुन उगम पावलेली एक दक्षिणवाहिनी नदी आहे. तिच्या काठाकाठाने प्रवाहाच्या दिशेने गेले असता महाकालीचे जागृत स्थान लागेल. तिथे देवीचे दर्शन घेऊन चालत राहिले असता, काही अंतरावर नदीच्या काठावर हत्तीच्या पावला एवढी एकशेएक कुंडे लागतील. त्याच परिसरात उगवलेल्या पांढऱ्या रंगाची वेल, जिला शुक्लवेल म्हणतात ती उखडून प्रत्येक कुंडात टाकत जा. माघारी परत असताना निरीक्षण कर. ज्या कुंडातील वेल सजिव राहीली असेल, त्या पाण्याने स्नान कर आणि तेच पाणी प्राशन कर. जलपान करताच तुझी शुद्ध हरपेल. पण बेशुद्धीतही आदित्याच्या बारा नावाचा जप केल्यास प्रत्यक्ष सूर्यदेव तुझ्या हाकेला प्रतिसाद देऊन धावत येईल. आणि तुला शुद्धीवर आणून आशीर्वाद देईल मग त्या कुंडातील पाणी घेऊन मार्तंड पर्वतावर आणून सुर्याचा बारा नाममंत्र जप करीत या नाग अश्वत्थ वृक्षाला सिंचन केल्यास देवता प्रसन्न होऊन तुला इच्छित वरप्राप्ती होईल. तथापि एका वेळेस एकच देवता जाग्रुत होईल. अर्थात सर्व देवतांना प्रसन्न करून घेण्यासाठी तुला पुन्हा पुन्हा सहा महिने तरी खेपा घालाव्या लागतील. तेव्हा शीघ्र कार्यारंभ करून यशस्वी हो.” असा उपसंहार करून अंबा सप्तश्रृंगीस परतली.

मच्छिंद्रनाथांनी अंबामातेच्या सांगण्याप्रमाणे केले असता फक्त आदित्य नावाच्या कुंडातील शुक्लवेल सजीव दिसली. त्या कुंडातील पाण्याने स्नान करून पाणी प्राशन करताच मच्छिंद्रास तीव्र मूर्च्छा आली, तो घामाने ओलाचिंब झाला. डोळ्यांपुढे अंधारी आली. देह गलितगात्र झाला आणि प्राण कंठाशी आले परंतु ह्या अवस्थेतही सूर्याच्या बारा नावचे मंत्राचारण मात्र सुरु होते. प्रत्यक्ष सुर्यानारायाणाला ते स्वतःवरचेच संकट वाटले आणि सूर्यदेव सौम्य स्वरूपात तेथे आले. त्यांनी मच्छिंद्रास सावध केले. "तुझी मनोकामना पूर्ण होईल, यशस्वी हो." असा आशीर्वाद देऊन ते परतले. मच्छिंद्रनाथ त्या आदित्य कुंडामधले पाणी घेऊन परत मार्तंड पर्वतावरील नाग अश्वत्थ वृक्षाजवळ आले. नम्रतेने नमस्कार करीत त्यांनी सुर्यानारायाणाला आव्हान करीत जलसिंचन केले, सूर्यदेव प्रकट होऊन म्हणले, "बोला साधाका! काय इच्छा आहे, मी तुझ्या वर प्रसन्न झालो आहे"

मच्छिंद्र उत्तर देताना म्हणाले; 'हे तमनाशका सूर्यदेवा!! मानव जातीच्या काल्याणास्तव 'शबरी विद्या कवन' रचण्याची माझी इच्छा आहे. त्यासाठी आपण मला मदत करा. ज्या ज्या मंत्र काव्या द्वारे आपणास आव्हान करून पठण केले जाईल, त्याप्रमाणे ते कार्य सिद्धीस जाईल असा वर आपण द्यावा"

"तथास्तू!" असा आशीर्वाद देऊन सर्यदेव वचनबद्ध झाले. अशा प्रकारे एक एक देवता प्रसन्न करून त्या त्या विशिष्ठ देवतेच्या वरदान प्राप्तीसाठी मच्छिंद्रनाथ सात महिने सातत्याने येणे जाणे करीत होते. सर्व इष्ठ देवतांची वरप्राप्ती करुन अविरत प्रयत्नांनी शबरी विद्येची ग्रंथरचना आकारास आली. मच्छिंद्रनाथांचे ईस्पित साध्य झाले होते. भूलोकीच्या संकटग्रस्तांसाठी त्याने हे अलौकिक शाबरी विद्या कवन निर्मिले आणि त्या योगे संकटग्रस्तांनी त्याच्या पठणाच्या आधारे आपत्तीमुक्त व्हावे हेच तर साध्य होते.

त्यानंतर मच्छिंद्रनाथ बंगालमध्ये तीर्थयात्रे निमित्त पोहोचले. तीर्थ स्थानाच्या शोधात सागरकिनारी वसलेल्या चंद्रगिरी नगरीत ते हिंडत असतांना सर्वोपदयाळ नावाच्या गौड ब्राह्मणाच्या दारात येऊन त्यांनी 'अल्लख निरंजन! भिक्षा वाढा माई!!" असे त्या कुटुंबाला आव्हान केले. मच्छिंद्राच्या आव्हानास प्रतिसाद देण्यासाठी त्या गौड ब्राह्मणाची अर्धांगिनी; सरस्वती भिक्षा वाढण्यासाठी बाहेर आली. सर्वगुणसंपन्न अशी ती लावण्याची प्रतिमा होती. नक्षत्रासारखी देखणी, सौदामिनी सारखी तेजस्विनी, कुंदकळ्यासारख्या शुभ्र दंतपंक्ती, सरळ नाक, लाल चुटूक पोवळ्याप्रमाणे धनुष्याकारी ओष्ट, पाणीदार टपोरे डोळे, गौरवर्णी भालावरील उगवत्या सूर्यासम कुंकूमतिलक, रेश्मा सारखे मृदु मुलायम केशसंभार आणि त्यातूनच डोकाविणारी सुवर्णाची कर्णफुले कृष्ण ढगांमधून लपूनछपून चमकत राहणाऱ्या षटकोनी नक्षत्राप्रमाणे भासमान होत होती. या गुणवैशिष्टायांनी एकूणच तिच्या व्यक्तिमत्वात दैवी रूपाचे साधर्म्य आढळत होते, तरही न्यून म्हणजे तिचा चेहरा मात्र म्लान आणि दुःखी कष्ठी वाटत होता. त्याचे कारण म्हणजे तिच्या पोटी संतती नसल्यामुळे तिला वांझपणाची उपाधी मिळाली होती. तिचा जगण्यातला आनंद नाहीसा झाला होता. पुत्र प्राप्ती साठी अनेक देवदेवतांची आराधना करून झाली, नाना उपाय झाले परंतु सर्व निष्फळ ठरले, तिचे जगणेच निरस झाले होते, घरात दिवा नसल्यामुळे अंधार भरून रहावा तसे कुलदीपक नसल्यामुळे जीवन अधःकारमय झाले होते, निपुत्रिकाचे तिरस्कार आयुष्य नशिबी आले होते, कांतिमान अशा चेहऱ्यावर सुंदर वास्त्रलंकार आणि गळ्यात सुगंधित फुलांच्या माळा घातल्या, पण देहात प्राण नसेल तर? प्रेतदर्शन कधीच सुखदायक वाटत नाही तद्वत ते सजीव प्रेतासमान भासत होती.

तिने मच्छिंद्रनाथांना भिक्षा वाढली आणि चरणस्पर्श केले मानतील दुःखावेग तिला आवरता येत नव्हता. मच्छिंद्रनाथांना एका वस्त्रासनावर बसवून काही अंतरावर ती बसली पण मनातले दुःख व्यक्त झाल्यामुळे ती हुंदके देत दुःखाश्रू ढाळू लागली. त्यावर मच्छिंद्रनाथ विचारू लागले, "माई! का शोक करतेस?, मला सांग, मी तुझे दुःख निवारण करीन." त्यावर ती ब्रह्मण स्त्री सांगू लागली, "साधू महाराज! आपण सर्वगुणी ज्ञानी आहात आणि दयाळू आहात मजवर आपण दया करा योगी महाराज! माझ्या नशिबी पुत्र सुख नाही. वांझपणाचे, निपुत्रीकाचे दुःख मनाला जाळते आहे. माझ्यावर दया करा आणि मला या शापातून मुक्त करा", अशी आपली व्यथा तिने कथन केली.

भूलोकीवरील दुःखी कष्ठी जीवांची पिडा आणि क्लेश नाहीसे व्हावेत म्हणून तर भगवंताने नाथ सांप्रदायची निर्मिती केली आहे, याचे स्मरण होऊन मच्छिंद्रनाथांनी भस्म झोळीत हात घालून चिमुटभर भस्म काढले. आदित्य मंत्राचा जप करून महाशक्तीला पाचारण केले, त्या भस्मात साक्षात सुर्यविर्याचा संचार झाला. विप्रभार्येला भस्म देताना मच्छिंद्र म्हणाले, " हे माई! हे भस्म घे, रात्री झोपताना हे भस्म खात जा, ही साधी रक्षा नसून हे सूर्यतेज आहे. यातून हरी नारायण अवतार घेईल आणि त्रिखंडात कीर्तिमान होईल. या दिव्यशक्ती युक्त भस्मापासून तुला जो पुत्र होईल त्याला अनुग्रह देऊन विद्या पारंगत करण्यासाठी मी बारा वर्षांनी परत येईन आणि तुझ्या पुत्राला सर्व सिद्धींचा राजा करीन. माई, तू सुखी होशील. भस्म मात्र खात जा. तू एका तेजाची जन्मदात्री होणार असे सांगून मच्छिंद्रनाथ तिर्थयात्रेसाठी निघून गेले.

विप्रभार्या सरस्वतीचा आनंद गगनात मावत नव्हता. तिने भस्माची पुरचुंडी काळजीपूर्वक बांधून ठेवली. योगी महाराजांच्या शब्दांनी आणि भाविष्यवाणीने ती स्त्री अत्यंत प्रभावित झाली होती. तिच्या वृत्ती आनंदीत झाल्या होत्या, प्रफुल्लीत होऊन ती शेजारणी कडे गेली. तिथे तिच्या काही मैत्रिणी एकत्र जमून गप्पागोष्टींत रमल्या होत्या. अंगभूत असलेल्या स्त्रीसुलभ वैशिष्ट्यांमुळे सरस्वतीला केव्हा एकदा मैत्रीणींपुढे मन मोकळे करीन असे झाले होते. शेवटी तिने आपली सुवार्ता सर्वांना ऐकविली. "सख्यांनो! आज माझे भाग्य उदयास आले, संततीप्राप्तीसाठी मी व्याकूळ झाले होते आणि घरी एक तेजस्वी आणि राजबिंडा कानफाटी योगी आला होता. त्यांना मी माझी व्यथा सांगितली. त्यावर त्याने प्रसाद म्हणून मला भस्म खाण्यास दिले आहे. दिव्या अवतारी पुत्र जन्मेल असा आशीर्वादही दिला आहे. खरं का गं मैत्रिणींनो! मला बाळ होईल? मी आई होईन? तेव्हा त्या जमलेल्या शेजारणी म्हणाल्या, "अगं खुळी आहेस कां तू? भस्माने कुठे मुले जन्मतात का? साधूंची सोंगे घेऊन अनेक ठग भटकत असतात. जादूटोण्याने नाना चमत्कार करून तुझ्या सारख्या भोळ्याभाबड्यांना फसवितात. कानफाटे तर अधिकच आक्रमक असतात, त्यांच्याकडे अनेक चमत्कारी विद्या असतात तुझ्यासारखी एखादी लावण्यवती स्त्री दिसली की मंत्र तंत्रणे तिला कुत्री बनवून दिवसभर घेऊन फिरतात आणि रात्री पुनःश्च स्त्री रुपात आणून तिचा भोग घेतात. यालाच मायावी विद्या म्हणतात. तू कशी या भ्रमात पडलीस. आम्हाला बाई हे काय बरे दिसत नाही.

शेजारणीचे ते विचार ऐकून सरस्वती भयभीत झाली, नशिबाला दोष देत ती घरात परतली. माझ्या असाह्यतेचे फायदा घेऊन कोणी ही माझ्या भावनांशी खेळावे, माझ्या स्वप्नांची थट्टा करावी? नैराश्याच्या तिरमिरीत घरामध्ये दडवून ठेवलेली ती भस्माची पुरचुंडी तिने गायींच्या गोठ्यातील शेणाच्या उकीरड्यांत भिरकावून दिली. काही दिवसांनी ही घटना ती विप्र भार्या विसरून संसारांत रमूनही गेली.

विधीलिखित अट्टल असते. सरस्वतीने दुसऱ्याचे ऐकून दुर्बुद्धीने भस्म उकिरड्यात टाकले आणि त्यात विष्णूचा अंश असणाऱ्या तेज पुंज कीर्तीध्वज 'हरी' नारायणाने संचार केला. हरीनारायण गाईच्या शेणाच्या उकिरड्यात, गोवऱ्याच्या ढीगाऱ्याखाली वाढू लागला.

फलश्रुती: या अध्यायाच्या नित्यपठणामुळे, दारिद्र्यानाश होऊन धन:संपत्ती प्राप्त होईल.